कारागृह करण्यात येणा-या उद्योगाचा
विकास करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.

शासन शुध्दीपत्र क्रमांक-एमआयएस-१०९३/२३/[९२]पीआरएस-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ दिनांक:- १७ ऑगस्ट १९९५.

वाचा:- शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-एमआयएस-१०९३/२३[९२]पीआरएस-२
दिनांक-३० मे १९९५.

शुध्दीपत्र :- शासन निर्णय, गृह विभाग, क्र. एमआयएस-१०९३/२३/[९२]पीआरएस-२ दिनांक-३० मे १९९५ मधील परिच्छेद १ व २ ऐवजी सुधारीत परिच्छेद १ व २ पुढीलप्रमाणे वाचण्यात यावेत.

परिच्छेद :-१ कारागृहात करण्यात येणा-या उद्योगाचा विकास करण्याबाबत कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह व येरवडा मध्यवर्ती कारागृह, येथे प्रत्येकी एक असे १००x८० आकारमानाचे वर्कशेड बांधणे अत्यंत जरुरीचे असल्याने सदर बांधकामास खालीलप्रमाणे होणा-या अंदाजित रु. ४८,७१,७४६, [अठ्ठेचाळीस लाख एकाहत्तर हजार सातशे सेहचाळीस] इतक्या खर्चास या आदेशाव्दारे शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १] कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह येथील वर्कशेड | रु. २४,००,०००/- |
| २] येरवडा मध्यवर्ती कारागृह येथील वर्कशेड | रु. २४,७१,७४६/- |
| एकूण | रु. ४८,७१,७४६/- |

[एकूण अठ्ठेचाळीस लाख एकाहत्तर हजार सातशे सेहचाळीस मात्र]

" अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करण्यात येऊ नये "

परिच्छेद :-२ " प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च -०१-कार्यालयीन इमारती १०१ बांधकाम-तुरुंग पंचवार्षिक योजनांर्गत योजना" या लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व संबंधीत आर्थिक वर्षात या लेखाशिर्षाखाली असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(स्वाक्षरी)
[ श्री. प. सोनवणे ]
अवर सचिव, महाराष्ट्रशासन, गृह विभाग.

प्रति,

१] कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२] कारागृह उप महानिरीक्षक, [मुख्यालय] महाराष्ट्र राज्य, पुणे/पश्चिम विभाग, पुणे मध्य विभाग, औरंगाबाद/पूर्व विभाग, नागपूर, दक्षिण विभाग, मुंबई.

३] महालेखापाल, महाराष्ट्र [१][२], लेखा व अनुज्ञेयता मुंबई/नागपूर.

४] महालेखापाल [१][२], लेखा परीक्षा, मुंबई/नागपूर.

५] अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

६] निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

७] अधिक्षक, कोल्हापूर मध्यवर्ती कारागृह, कोल्हापूर.

८] अधिक्षक, येरवडा मध्यवर्ती कारागृह, पुणे.

९] निवड नस्ती, पीआरएस-२.